आदिवासी घटक कार्यक्रम सन २०२१-२२ अंतर्गत केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन ) या योजनेचे निधी वितरण (राज्य हिस्सा-२२१५ अे ०६१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र. क्र.१०/ का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ डिसेंबर,२०२१.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ / अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.जजीमि- २०२१ / प्र.क्र. २२४ /पापु-१०

**प्रस्तावना:-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत योजनेतून ग्रामीण आदिवासी लाभार्थ्यांना पिण्याच्या पाण्याकरीता सोई सुविधा उपलब्ध करून देण्यात येतात. जल जीवन मिशन कार्यक्रमाची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यात येत असून या कार्यक्रमाचा गाव, जिल्हा व राज्य कृती आराखडा तयार करण्याची कार्यवाही पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत सन २०१९-२० व २०२०-२१ या वर्षातील केंद्र हिश्श्याकरीता प्रत्यक्ष प्राप्त निधीच्या समरूप राज्य हिश्श्याकरीता निधी उपलब्ध करून देणे शक्य न झाल्याने प्रलंबित निधी सन २०२१-२२ च्या तरतूदीमधून वितरीत करण्याबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथील नस्ती अन्वये विनंती केल्यानुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता या मुख्य शीर्षाखालील राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या योजनेकरीता सन २०१९-२० व २०२०-२१ या वर्षातील प्रलंबित समरूप राज्य हिश्श्याकरीता सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून खालीलप्रमाणे ५० टक्के मर्यादेतील उपलब्ध निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| **योजनेचे नांव** | **बाब** | **सन २०२१-२२ अर्थसंकल्पित तरतूद** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|
| राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम राज्य हिस्सा (२२१५ अे०६१) | ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ६०००.०० | ३०००.०० |

२. उपरोक्त प्रमाणे रु.३०००.०० लाख (अक्षरी रुपये तीस कोटी फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल,लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२०१२०६४६३७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2021.12.28 15:50:01 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

६. प्रकल्प अधिकारी सर्व, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (पापु-१० ) मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (का.१७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.